रिट याचिकांच्या अनुषंगाने नियुक्त केलेल्या
विधिज्ञांची देयके अदा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : पु.मा. - २०२३/प्र.क्र.०१/१५-स**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- २२.०८.२०२३

**संदर्भ :-** १. शासन निर्णय,वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७/०४/२०१५
२. विधी व न्याय विभाग यांचे दि.२३.०६.२०२१ रोजीचे पत्र
३. ॲड.विजय थोरात यांची दि.२५.०५.२०२१, दि. ०९.०६.२०२१ , दि.१६.०६.२०२१ , दि.१६.११.२०२१ व दि.२२.०९.२०२२ रोजीची पत्रे
४. या विभागाचा शासन निर्णय क्र.याचिका-२०२१/प्र.क्र.२३/१५-स, दि.२५.११.२०२१
५. या विभागाचा शासन निर्णय क्र.याचिका-२०२१/ प्र.क्र.२३/१५-स, दि.१४.१०.२०२२.
६. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.पूरक-२०२३/प्र.क्र.६२/अर्थ-३, दि.२८.०७.२०२३.
७. या विभागाचा शासन निर्णय क्र.पुरक-१९२३/ प्र.क्र.३६/२०२३/१७ स, दि.३१.०७.२०२३.

**<u>प्रस्तावना</u> :-**

यशवंत सहकारी साखर कारखान्याशी संबंधित मा.मंत्री (सहकार) यांचेकडे दाखल दोन अपिल अर्जामध्ये दिलेल्या आदेशाविरोधात मा.उच्च न्यायालय येथे रिट याचिका १७८२/२०२१, १०८९८/२०२१ तसेच १०३६८/२०२१ दाखल झाल्या होत्या. यानुषंगाने सदर तिन्ही याचिकांमध्ये शासनाची बाजू मांडण्यासाठी ॲड.विजय थोरात यांची ज्येष्ठ विधिज्ञ म्हणून दिनांक २३.०६.२०२१ रोजीच्या पत्रान्वये नियुक्ती करण्यात आली आहे. सदर नियुक्तीस विधी व न्याय विभागाने संदर्भाधिन क्र.२ च्या पत्रान्वये मान्यता दिली आहे. उपरोक्त याचिकांच्या अनुषंगाने ॲड. विजय थोरात यांना मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे शासनाची बाजु सक्षमपणे मांडली आहे. संदर्भाधिन क्र.३ च्या पत्रान्वये ॲड.विजय थोरात यांनी व्यावसायिक फी रु.१९,००,०००/- अदा करणेबाबत शासनास विनंती केली होती. त्यानुषंगाने ॲड.विजय थोरात यांना संदर्भाधिन क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये रु. ५.२५ लाख व संदर्भाधिन क्र.५ येथील शासन निर्णयान्वये रु. १.९६ लाख असे एकूण रु. ७.२१ लाख इतकी रक्कम अदा करण्यात आलेली आहे. उर्वरित रक्कम रु. ११.७९ लाख इतकी व्यावसायिक फी ॲड.थोरात यांना अदा करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय :-**

रिट याचिका क्र. १७८२/२०२१, १०८९८/२०२१ तसेच १०३६८/२०२१ या याचिकांच्या अनुषंगाने शासनाची बाजू मांडण्याकरीता नियुक्त केलेल्या ॲड. विजय थोरात, जेष्ठ विधिज्ञ यांच्या व्यावसायिक शुल्काच्या देयकांची रक्कम रु. ११,७९,०००/- इतकी अदा करण्यासाठी या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर रकमेपैकी, आयकर अधिनियमान्वये देयकातुन आयकर कपात (आयकर अधिनियम १९६१ च्या १९४ (१) मधील तरतुदीनुसार) आयकर कपात करावयाच्या रकमेचे calculation खालीलप्रमाणे आहे -

*रक्कम रुपयात*

| अ. क्र. | सादर केलेल्या देयकाची रक्कम | १०% आयकराची कपात | आयकराच्या ४% शिक्षण निधी कपात | कपातीची एकुण रक्कम रकाना (३+४) | एकुण देय रक्कम रकाना (२-५) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १. | ११,७९,०००/- | १,१७,९००/- | ४,७१६/- | १,२२,६१६/- | १०,५६,३८४/- |

सदर रकमेतून आयकर अधिनियमान्वये (आयकर अधिनियम १९६१ च्या १९४ (१) मधील तरतुदीनुसार) १० % आयकर तसेच आयकराच्या ४ % शिक्षण निधी कपात केल्यानंतर रु.१०,५६,३८४/- (रुपये दहा लाख

छप्पन हजार तीनशे चौऱ्यांऐंशी फक्त) श्री. विजयसिंह अनंतराव थोरात, बँक ऑफ बडोदा, Account Number-०६९६०१०००००८२८, IFSC Code-BARBOFORTUN यांचे नांवे RTGS करण्यात यावी. त्यांचा पॅन क्रमांक AABPT७२२८C असा आहे.

३. या शासन निर्णयाद्वारे अदा करावयाची रक्कम रु. ११,७९,०००/- (रुपये अकरा लाख एकोणऐंशी हजार फक्त) इतकी वितरित करण्याकरीता श्री.सुरज पांगारकर, कार्यासन अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच श्री.संतोष खोरगडे, उपसचिव (आस्थापना), ( V०००७ ) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र.व्ही-२, प्रधान लेखाशीर्ष ३४५१, सचिवालयीन-आर्थिक सेवा, ०९०, सचिवालय, (०१) सचिवालयीन आर्थिक सेवा, (०१)(०१) सचिवालयीन आर्थिक सेवा (अनिवार्य) (३४५१ ०३०४) २८- व्यावसायीक सेवा या लेखाशिर्षातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.५१२/२०२३, दिनांक ११.०८.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार तसेच महाराष्ट्र उपनिर्दिष्ट २ येथील शासन निर्णय, वित्त विभाग मध्ये नमुद केल्यानुसार वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग-पहिला,उपविभाग-चार, अनुक्रमांक ११ व महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम १९६५ मधील नियम १६६ अन्वये प्रशासकिय विभागास असलेल्या पूर्ण अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०८२२१५५९५०९७०२ असा आहे.हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIJAYA DHUNDAPPA SANGSHETTI

Digitally signed by VIJAYA DHUNDAPPA SANGSHETTI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=ae95fd689dc752099ad3857a24b8ccbff566bb5dbcdbaacf0d58735c1ef9da82, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C0422C17B24964BFB1F10270074369C4888C02315C6A4C050EAA332B556F90EA, cn=VIJAYA DHUNDAPPA SANGSHETTI
Date: 2023.08.22 16:02:44 +05'30'

**( विजया संगशेट्टी )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.
२) मा.अप्पर मुख्य सचिव (सहकार व पणन) यांचे स्वीय सहायक
३) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा ) महाराष्ट्र-१,मुंबई.
४) अधिदान व लेखा कार्यालय,मुंबई
५) निवासी लेखा अधिकारी,मुंबई
६) कक्ष अधिकारी (रोख शाखा) सहकार,पणन व वस्त्रोद्योग, विभाग, मंत्रालय यांना पुढील योग्य त्या कार्यवाहीसाठी.
७) अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग, विभाग, मंत्रालय , मुंबई ३२.
८) वित्त विभाग कार्या.व्यय- २ व अर्थ -१३, मंत्रालय.
९) ॲड.विजय थोरात, जेष्ठ विधिज्ञ, मा. उच्च न्यायालय, मुंबई
१०) निवडनस्ती १५-स.